असा. क्र. २०

रजिस्टर्ड नं. एमएच/एमआर/साऊथ-२२९/२००६–०८

# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण

प्राधिकृत प्रकाशन

गुरुवार, फेब्रुवारी २१, २००८/फाल्गुन २, शके १९२९

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

## भाग चार-अ

**महाराष्ट्र शासनाने केंद्रीय अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

### सामान्य प्रशासन विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २१ फेब्रुवारी २००८

**अधिसूचना**

**भारतीय संविधान.**

क्रमांक शाकानि. १००८/प्र.क्र. ४/२००८/१८ (र.व का.).– भारतीय संविधान अनुच्छेद १६६ च्या खंड (३) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करून, महाराष्ट्राचे राज्यपाल याद्वारे, महाराष्ट्र शासनाच्या कार्यनियमावलीत आणखी सुधारणा करण्यासाठी पुढील नियम करीत आहेत :–

१. या नियमांना महाराष्ट्र शासन कार्यनियमावली (सुधारणा) नियम, २००८ असे म्हणावे.

२. महाराष्ट्र शासन कार्यनियमावलीच्या पहिल्या अनुसूचीमध्ये,–

(एक) '' शासनाचे विभाग '' या शीर्षाखाली, नोंद क्रमांक २९ नंतर खालील नोंद समाविष्ट करण्यात यावी :–

'' ३०. अल्पसंख्याक विकास विभाग. ''.



[ **किंमत** : रुपये ७.०० ]

(दोन) '' सामान्य प्रशासन विभाग '' या शीर्षाखालील '' एक. सर्वसाधारण उप विभाग '' या उप शीर्षामधील अल्पसंख्याकांच्या कल्याणाकरिता केंद्र शासनाच्या १५ कलमी कार्यक्रमांचा अंमलबजावणीचा समन्वय, तसेच त्यांची गाऱ्हाणी व विशिष्ट प्रश्न या संबंधीचे कामकाज, याच्याशी संबंधित असलेली नोंद ४६-फ वगळण्यात यावी ;

(तीन) '' ३. महसूल व वन विभाग '' या शीर्षाखालील '' चार. सर्वसाधारण '' या उप शीर्षामधील शासनाच्या नियंत्रणाखाली व्यवस्थापन केल्या जाणाऱ्या वक्फ (वक्फ अधिनियम, १९५४ खाली मराठवाडा प्रदेशातील कार्यान्वित करण्यात येत असलेल्या वक्फसह) व धार्मिक व धर्मादाय संस्था (तसेच विधी व न्याय विभागाखालील नोंद क्रमांक ५ व १८ पहा), याच्याशी संबंधित असलेली नोंद ५५ वगळण्यात यावी ;

(चार) '' २९. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग '' या शीर्षाखालील '' दोन. सांस्कृतिक कार्य विभाग '' या उप शीर्षामधील '' राज्य हिंदी अकादमी '' शी संबंधित असलेली नोंद ३१, '' राज्य सिंधी अकादमी '' शी संबंधित असलेली नोंद ३२, '' राज्य उर्दू अकादमी '' शी संबंधित असलेली नोंद ३३ आणि '' राज्य गुजराथी अकादमी '' शी संबंधित असलेली नोंद ४४ या नोंदी वगळण्यात याव्यात ;

(पाच) खालील शीर्ष, उप शीर्ष आणि नोंदी यांचा समावेश शेवटी करण्यात यावा :–

'' ३०. अल्पसंख्याक विकास विभाग

**एक. अल्पसंख्याक विकास उप विभाग**

(१) अल्पसंख्याकांच्या कल्याणासाठी मा. पंतप्रधानांच्या १५ कलमी कार्यक्रमाचे समन्वयन व आढावा.

(२) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे शासकीयस्तरावरील संनियंत्रण आणि समन्वयन.

(३) महाराष्ट्र राज्य हज समितीचे शासकीयस्तरावरील संनियंत्रण आणि समन्वयन.

(४) राज्यातील अल्पसंख्याकांकडून चालविल्या जाणाऱ्या शैक्षणिक संस्थांना ना हरकत प्रमाणपत्रे देण्याबाबत.

(५) वक्फ (वक्फ अधिनियमासह ) व त्याअनुषंगीक बाबींची शासकीयस्तरावरील अंमलबजावणी, संनियंत्रण व समन्वयन.

(६) मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळाचे शासकीयस्तरावरील संनियंत्रण व समन्वयन.

(७) महाराष्ट्र राज्य उर्दू अकादमी, महाराष्ट्र राज्य सिंधी अकादमी, महाराष्ट्र राज्य हिंदी अकादमी व महाराष्ट्र राज्य गुजराथी अकादमी यांचे शासकीयस्तरावरील संनियंत्रण व समन्वयन.

(८) न्यायमुर्ती सच्चर समितीच्या स्वीकृत शिफारशीसंबंधातील बाबींची अंमलबजावणी, संनियंत्रण व समन्वयन.

(९) अल्पसंख्याकांसाठी केंद्र पुरस्कृत विविध योजनांचे राज्यस्तरीय समन्वयन.

(१०) राज्य शासनाने अल्पसंख्याकांच्या कल्याणासाठी जाहीर केलेल्या सर्व योजनांचे समन्वयन व आढावा.

(११) अल्पसंख्याकांच्या विकासाबाबत वेळोवेळी तज्ज्ञांचे/तज्ज्ञ संस्थांचे अभ्यासगट नेमून त्याआधारे धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करणे.

(१२) अल्पसंख्याकांशी संबंधित इतर विषय.

**दोन. सर्वसाधारण**

(१३) अल्पसंख्याक विकास विभागाला नेमून दिलेल्या कोणत्याही विषयासंबंधातील हुकूमनाम्याची देय असलेली रक्कम निर्लेखित करणे.

(१४) या सूचीतील कोणत्याही बाबीच्या प्रयोजनासाठी चौकशी व आकडेवारी.

(१५) या सूचीतील कोणत्याही बाबीच्या संबंधात परंतु कोणत्याही न्यायालयात स्वीकारण्यात न आलेली फी.

(१६) राज्याच्या प्रयोजनासाठी शासनाकडे विहित केलेली किंवा शासनाच्या ताब्यात असलेली आणि अल्पसंख्याक विकास विभागाला नेमून दिलेली बांधकामे, जमिनी व इमारती.".

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**जॉनी जोसेफ,**

शासनाचे मुख्य सचिव.

## GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 21st February 2008

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No.ROB. 1008/CR-4/2008/XVIII (O.& M.).—In exercise of the powers conferred by clause (3) of article 166 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules further to amend the Maharashtra Government Rules of Business, namely :—

1. These rules may be called the Maharashtra Government Rules of Business (Amendment) Rules, 2008.

2. In the FIRST SCHEDULE to the Maharashtra Government Rules of Business.—

(*i*) under the heading " DEPARTMENTS OF GOVERNMENT ", after entry 29, the following entry shall be added, namely :—

" 30. Minority Development Department. ";

(*ii*) under the heading " GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT ", in sub-heading " I. General Division ", entry 46-F relating to Co-ordination of implementation of the Prime Minister's 15 Point Programme for the Welfare of the Minorities and work related to the specific problems and complaints of minorities, shall be deleted ;

(*iii*) under the heading " 3, REVENUE AND FORESTS DEPARTMENT ", in sub-heading " IV. General " entry 55 relating to Waqfs (including waqfs administered under the Waqfs Act, 1954 in the Marathwada Region) and religious and charitable institutions managed under Government (*See* also Entries Nos. 5 and 18 under the Law and Judiciary Department), shall be deleted ;

(*iv*) under the heading " 29. TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT ", in sub-heading " II. Cultural Affairs Division ", entries 31 relating to " State Hindi Academy.", 32 relating to " State Sindhi Academy.", 33 relating to " State Urdu Academy " and 44 relating to " State Gujrathi Academy ", shall be deleted ;

(*v*) the following heading, sub-headings and entries shall be added at the end of Rules of Business, namely :–

" 30. MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT

## I. Minority Development Division

1. Co-ordination and review of Hon'ble Prime Monister's New 15 Point Programme for the welfare of Minorities.

2. Monitoring and co-ordination of Maharashtra State Minorities Commission at Government level.

3. Monitoring and co-ordination of Maharashtra State Haj Committee at Government level.

4. Grant of No-Objection Certificates to the educational Institutions run by the Minorities in the State.

5. Implementation, monitoring and co-ordination of Waqfs (Including Waqfs Act) and related matters at Government level.

6. Monitoring and Co-ordination of Maulana Azad Alpsankhayank Arthik Vikas Mahamandal at Government level.

7. Monitoring and co-ordination of Maharashtra State Urdu Academy, Maharashtra State Sindhi Academy, Maharashtra State Hindi Academy and Maharashtra State Gujrathi Academy at Government level.

8. Implementation, monitoring and co-ordination of matters related to the accepted recommendations of Sachar Committee.

9. State level co-ordination of various schemes for monorities sponsored by the Central Government.

10. Co-ordination and review of various schemes announced by the State Government for the welfare of Minorities.

11. Submission of proposals for the approval of the Government to take policy decisions for the development of minorities by appointing experts/ expert Organisation's study groups.

12. Other related subjects concerned with minorities.

## II. General

13. Writing off of decretal dues in respect on any subject allotted to the Minority Development Department.

14. Inquiries and Statistics for the purpose of any of the matter in this list.

15. Fees in respect of any of the matters in this list but not including fees taken in any Court.

16. Works, lands and buildings vested in or in the possession of Government for the purposes of the State and assigned to the Minority Development Department.".

By order and in the name of the Governor of Maharashtra,

JOHNY JOSEPH,
Chief Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई